# "वाजा" ची जीत



"वाजा" एक पांढर्या शुभ्र रंगाची उंटिण होती. सेनेच्या उंटांच्या तुकडीमधे तिचा सामावेश केला गेला हेता. 'डर्टीशर्ट डैन', हा उंटांचा विशेष करून वाजाचा द्वेष करीत असे. तो खेचरांचा प्रमुख चालक होता.

वाजाला अवमानित करण्याचा निश्चय डर्टीशर्ट डैनने केला होता. पण जेव्हा जेव्हा त्याने प्रयत्न केला तेव्हा तेव्हा अस काहीतरी घडत असे की वाजाचीच जीत होत असे.

१९ व्या शतकाच्या मध्यकाळात दोन जहाजांमधे उंट भरून त्यांना टेक्सासमधे आणण्यात आले होते. सैनिकांना लागणारी रसद कॅलिफोर्नियापर्यंत पोहोचविण्याचे काम या उंटांकडून करविले जात असे. त्यावेळच्या वर्तमानपत्रामधून उंटांविषयी हास्यास्पद मजेदार मजकूर छापला गेला होता. त्याचा आधार घेऊन ही गोष्ट लिहिली गेली आहे.

# "वाजा" ची जीत



मराठी : गार्गी लागू



# " उंट" इथे कसे आले?

१९व्या शतकाच्या मध्यावर अमेरिकेचे रक्षा मंत्री, जेफर्सन डेविस, देन जहाजात उंट भरून टेक्सासला पाठविले होते. जास्त करून मिस्र, टर्की, आणि अरब या देशातून हे उंट आणण्यात आले होते. हाई जाली आणि इतर उंट चालकही बरोबर आले होते.

लेफ्टनंट बीलने या उंटांचा उपयोग कॅलिफोर्नियाला रसद घेऊन जाण्यासाठी केला होता.या उंटाबद्दल अनेक मजेदार घटना घडल्या. काही त्यावेळच्या वृत्तपत्रामधून छापून आल्या तर काही कट्ट्यावरील गप्पामधून चर्चिल्या गेल्या. अशाच काही घटनांचे वर्णन या पुस्तकात केले आहे.



ही 'वाजा' उंटीण आहे. सैन्यातील उंट तुकडीत हीचा सामावेश आहे. हाई जाली हा उंटांचा प्रमुख चालक आहे. तुकडीतील सर्व उंट त्याला प्रिय आहेत पण शुभ्र रंगाची वाजा उंटीण त्याला विशेष प्रिय आहे.

हा डर्टिशर्ट डैन आहे. खेचरांचा प्रमुख चालक! त्याला सर्व उंटाबद्दल द्वेष आहे. पण सर्वात जास्त घृणा त्याला वाजा बद्दल वाटते. एकदा वाजा त्याच्या खेचरांच्या खूप जवळ आली. तेव्हा तो जोराने ओरडला, “दूर हो माझ्या खेचरापासून.....दुर्गंधी, घाणेरडे जनावर आहेस तू....”





हाई जालीने वाजाच्या मानेवर हलकेच थोपटले आणि म्हटले, "त्याचे काही ऐकू नको.....उंट आपल्यासाठी किती आवश्यक आहेत हे आम्हाला माहित आहे." आणि ते आहेतच.
लेफ्टनंट बील यांनी दोन जहाजातून उंट अमेरिकेत आणले. त्यांचे चालकहि बरोबर होते. ते सैनिकांची रसद पोहोचविण्याचे काम करीत होते.



सकाळी लवकर हाई जाली आणि त्याचे साथीदार उंटांवर सामान लादून आपल्या इच्छित स्थळी पोहोचण्यासाठी मार्गस्थ होत असत. डर्टीशर्ट बर्याच उशिरा आपल्या खाचरासहित येत असे. लवकरच सर्वांच्या लक्षात आले की खाचरापेक्षा उंट जास्त कामाचे आहेच.

उंट जास्त ओझ उचलू शकतात. पाण्याशिवाय खूप वेळपर्यंत चालू शकतात आणि रेगिस्तानच्या वाळवंटी प्रदेशात स्वत:चे अन्न शोधू शकतात. यामुळेच भांडण सुरू झाले.

डर्टिशर्ट डैन खूप जिद्दी होता. उंटांनी खाचरांवर मात करावी हे त्याला सहन होत नव्हते. "नाही .. नाही ! या उंटांना खाली खेचण्यासाठी काहीतरी करायलाच हवे.."तो आपल्या साथीदारांना म्हणाला, "नाहीतर सेनेला खाचरांची जरुर रहाणार नाही,"
त्याने खूप विचार केला.

नंतर अशी एक घटना घडली की ज्यामुळे डैनला खूप राग आला. एका शुष्क, कोरड्या दिवशी मोठ्या प्रवासानंतर त्याची तुकडी एका पाण्याच्या तलावापाशी थांबली. तहानलेली खाचर पाण्यासाठी अंधाधुंदपणे धावत सुटली. डर्टीशर्टने हात हलवून, ओरडून थांबायला सांगितले पण खाचर तलावावर पोहोचली आणि इतक पाणी प्यायली की आजारीच पडली.



उंट खाचरापेक्षा समजूतदार होते. जोपर्यंत हाई जालीने "पाण्याच गाण" ऐकविल नाही तोपर्यंत उंट पाणी प्यायले नाहीत.

तेर्रीह! तेर्रीह! तेर्रीह!



मग सगळे उंट पाणी प्यायला लागले. 'बघा..' डरटीशर्ट आपल्या साथीदारांना म्हणाला, "ही मूर्ख, बेडौल पाय असणारी जनावरं, जोपर्यंत त्यांना कुणी सांगत नाही तोपर्यंत पाणी पित नाहीत." हाई जाली म्हणाला, "त्यांना माझ गाण समजत!" "उंटांना गाण ऐकवाव लागत? हा तर मूर्खपणाचा कळस झाला.." डर्टीशर्ट ओरडून म्हणाला.

सर्व खाचर चालक उपहासाने हसू लागले. वाजाने मुख्य खाचर चालकाकडे रागाने पाहिलं आणि ती त्याच्या चेहर्यावर थुंकली. डर्टीशर्ट चिडून ओरडला, “मी तुला चांगला धडा शिकविन! मूर्ख, घाणेरड जनावर....”





वाजाने आपले पिवळे दात त्याला विचकून दाखविले. सर्व उंट चालक हसायला लागले. त्या क्षणी डर्टीशर्टने मनाशी निश्चय केला की केव्हा ना केव्हातरी या उंटापासून सुटका करून घ्यायचीच. 'मी तुम्हाला परत पाठविनच..जिथून तुम्ही आला अहात...नाहीतर मी माझ नाव बदलून देईन'

त्याने चोरून उंटांची गाणी शिकून घेतली व तो योग्य संधीची वाट बघू लागला. शेवटी त्याला संधी मिळाली.

एका फुटिर झालेल्या चालकाने लेफ्टनंट बीलला सांगितले की मवेशियाची एक टोळी कॅम्पच्या जवळच आहे. लेफ्टनंट बील म्हणाले की  “आपण त्या जनावरांपासून लांब रहायला हवे म्हणजे काही अडचण निर्माण होणार नाही.” डर्टिशर्ट कपटाने हसत उभा होता.

त्याला  माहित होते मवेशियांच्या जनावरांच्या टोळीला उंट किती संकटांत आणू शकतात. त्या रात्री रांगत तो वाजाच्या जवळ गेला. त्याला बघून वाजा गुरगुरायला लागणार तेवढ्यात त्याने तिची मान गोंजारायला सुरवात केली. वाजाला बर वाटलं. तिने डर्टीशर्टला तिला बांधलेली दोरी सोडू दिली. डैन तिला लपवून बाहेर घेऊन गेला.





लवकरच ते थांबले. डर्टीशर्टने उंटाच्या पायाच्या गुढग्यावर छडीने थोपटले. आणि वाकण्यासाठी गायल जाणारं गाण म्हटलं. ईटीईईई...ईटीईईई....ईटीईईई...
वाजाने तोंडातून आवाज काढला, "हरूउउम्फ“ आणि वाकून खाली बसली. डर्टीशर्ट तिच्या पाठीवर बसला. वाजाने परत आवाज काढला, “अन्न्न्वहररर!” आणि ती उभी राहू लागली. तिने प्रथम पुढचे दोन पाय सरळ केले. डर्टीशर्ट पडता पडता वाचला.





नंतर तिने मागचे दोन पाय सरळ केले. डर्टीशर्ट पुढे पडता पडता वाचला. "किती विचित्र प्रकार आहे उभ रहाण्याचा....” त्याने बडबड केली.

वाजा सरळ मावेशियाच्या दिशेने चालत राहिली. खेळत्या हवेमुळे तिच्या अंगाचा गंध मवेशियापर्यंत पोहोचला. एका म्हशीने जोराने श्वास घेतला. तिने गंध ओळखला आणि मान वर करून जोराने ओरडली उउउउउम्म्म्म! खूप विचित्र, घाबरवून टाकणारा वास येत आहे असे जोरात ओरडून सांगत धोक्याची सूचना दिली. '

'.बाआआआवर्ररर...'

वाजा हलत डुलत चालत होती. डर्टीशर्ट डैन घाबरून तिला घट्ट धरून बसला होता. त्याला चक्कर यायला लागली. त्याच हृदय बंद पडेल की काय अशी भिती त्याला वाटायला लागली. त्याला खाली उतरावच लागलं.

काही क्षणातच झुंडीमधे हलकल्लोळ माजला. सगळी मावेशी जनावर ओरडत होती, सैरावैरा पळत होती. काही घाबरलेल्या मावेशी जनावरांनी काऊबाईजच्या गाड्यांना टक्कर देऊन त्या उलटवून टाकल्या. काऊबाईज आपले अंथरूण सोडून आपल्या घोड्यांकडे धावले.



पळापळीने आणि आरड्याओरड्याने वाजा थकून गेली. आणि तिथेच बसून झोपून गेली. दुसर्या दिवशी सकाळी वाजाला पाहून रखवालदाराला काय घडल असेल याची कल्पना आली. घोड्यावर स्वार होऊन तो तडक उंटांच्या तुकडीकडे आला. लेफ्टनंट बील बरोबर झालेली बाचाबाची कॅम्पमधे सगळ्यांनी ऐकली.

"उंटांची सद्दी आता संपली !" डर्टीशर्टने मोठ्या आढ्यतेने सांगितलं. तो म्हणाला, "मी सांगितलं नव्हत, मी या उंटांना इथे राहू देणार नाही. आता या जनावरांना त्यांच्या घरी परत पाठविण्यात येईल."



पण नाही.......त्याऐवाजी लेफ्टनंट बीलने खेचरांच्या चालकांना हुकूम सोडला की ते पळून गेलेल्या मवेशियाच्या जनावरांना शोधून परत घेऊन येतील. डर्टीशर्ट नंतर कित्येक दिवस व्देषाने जळत राहिला. तो पुढच्या संधीची वाट पहात होता.



एका संध्याकाळी उंटाच्या तुकडीने भरपूर खेळती हवा असलेल्या गल्च नगरच्या जवळ मुक्काम ठोकला. दुसर्या दिवशी लेफ्टनंट बील आणि हाई जाली छान कपडे घालून नगरांत गेले.

"हीच संधी आहे" डर्टीशर्ट त्याच्या साथीदारांना म्हणाला. " मी त्या चालाख उंटीणीला अडचणीत आणणार आहे"
त्याला माहित होत की एखाद्या नगरात उंट शिरल्यावर काय परिस्थिती निर्माण होते. परत एकदा डर्टीशर्ट वाजाला कॅम्प बाहेर घेऊन आला. यावेळी तो खेचरावर बसला आणि उंटिणीला दोरी बांधून खेचत नगराच्या दिशेने निघाला. नगराच्या जवळ आल्यावर त्याने उंटीणीला सोडून दिले. आणि ओरडून म्हणाला, "जा, हवेशीर गल्चमधे तुझा गंध पसरव." आणि तो झटकन नगरामधे निघून गेला. नगरांत आता काय तमाशा होतो, तो बघायला तो उत्सुक होता.



दुपारची वेळ होती. गल्चमधे सगळीकडे शांत होते जोपर्यंत वाजा नगराच्या मुख्य रस्त्यावरून चालत नव्हती.

तिचा विचित्र आकार आणि वास याने सर्व प्राण्यांना घाबरवून टाकले. कुत्री, कोंबड्या घाबरून इकडे तिकडे पळायला लागली.

सगळे घोडे घाबरून फिस्कारून धावायला लागले. हसून हसून डर्टीशर्टचे पोट दुखायला लागले. वाजा अचानक बिअर- पास्मथच्या दुकानापुढे थांबली. खेचर चालक ओरडला, "आता थांबू नको" असे म्हणून त्याने उंटिणीला जोरात मारले. रागाने धुमसलेली वाजा दुकानात घुसली. तिने खांब उखडून टाकले. धडाम्म्म..! दुकानाचे छत कोसळले. हो हो हुईई! डर्टीशर्ट जोराने हसला. पण अचानक त्याचे हसणे थांबले. लाकडाचा एक खांब त्याच्या डोक्यावर आपटला आणि तो पाण्याच्या टबमधे पडला.






थोडी शांतता झाली तेव्हा वाजा रस्त्याच्या मधे उभी होती. "हे परमेश्वरा, हे काय जनावर आहे?" बिअर-पा स्मिथ ओरडला. "बिना शिंगाचा कुणितरी बारशिंगी दिसतोय" कुणितरी म्हणालं.

"अरे, अस असूच शकत नाही.....पण आहे....हा खरा खरा उंट आहे." एक लहान मुलगा ओरडला.

हाई जाली वाजाच्या पाठीमागे धावला. "वाल्लू....वाल्लू...वाल्लू.!” तो गाण म्हणत होता. वाजाने आपल्या मालकाचा आवाज ऐकला आणि एका बँकेसमोर ती उभी राहिली. तेव्हाच बँकेचा दरवाजा धाडकन उधडला आणि देन लूटारू धावत बाहेर आले. त्यांचायाजवळ बंदूका आणि पैशानी भरलेल्या थैल्या होत्या. ते त्यांच्या जघोड्यांच्या दिशेने धावले. पण तिथे एक मोठ्ठी पांढर्या रंगाची उंटिण उभी होती. लूटारूंच्या तोंडाचे पाणी पळाले. शेरिफने तत्परतेने कार्यवाही केली आणि लूटारूना समजण्याच्या आत ते तुरूंगात पोहोचले होते.



डर्टीशर्ट तिथे आला तेव्हा वाजाभोवती गर्दी जमलेली त्याने पाहिली. त्याला वाटले, वाजा संकटांत सापडली.



पण इथे वेगळेच काही चालू होते. लोक वाजाचा जयजयकार करित होते. "हुर्रे ! या उंटाने आज आमच्या बँकेचे कक्षण केले!"

डर्टीशर्ट थोडा जवळ आला. काय नक्की घडलं हे त्याने ऐकल्यावर तिथून पळून जाण्याचा प्रयत्न केला. पण वाजाने त्याला पाहिले. ती अत्यंत बेडौलपणे चालत मान थोपटवून घेण्यासाठी त्याच्या जवळ आली. डर्टीशर्टने तिच्याकडे रागाने पाहिल आणि म्हणाला, “चल, दूर हो, कमनशिबी जनावर!” पण वाजा त्याच्या खांद्यावर आपली मान घासू लागली. लेफ्टनंट बीलला हे पाहून खूप आश्चर्य वाटलं. "अरे, उंट तुम्हाला पसंत करतात, ही चांगली गोष्ट आहे. कारण हाई जालीला एका उंट चालकाची आवश्यकता आहे." "अरे नाही नाही....." डर्टीशर्ट म्हणाला. "अरे, हो हो...." लेफ्टनंट बील म्हणाला.




डर्टीशर्ट नाही म्हणत होता. त्याला माहित होते कि कॅम्पवर गेल्यावर सगळे त्याची खिल्ली उडविणार आहेत.



तो आपल्या खेचरावर बसून पळून गेला.उंटांच्या तुकडीने त्याला परत कधीच बघितले नाही. डर्टीशर्टने याची पूर्ण काळजी घेतली होती.

## त्यानंतर उंटांचे काय झाले?

त्यानंतर १० वर्षांनी अमेरिकन सरकारने उंटांचा उपयोग करणे थांबविले. काही उंट विकून टाकले. काहीना दक्षिणी पश्चिम रेगिस्तानमधे सोडून देण्यात आले.

वाजा एरिझोनाच्या वाळवंटात खूप वर्ष जगली. हाई जाॅली अमेरिकेत राहिला. १९०२ मधे तो मरण पावला. त्याची कबर आजही क्वार्टजाट, एरिझोनामधे बघायला मिळते. कबर दगडाची पिरामिडच्या आकाराची आहे. आणि त्यावर धातुचा उंट बनविला आहे.

